सहाय्यक प्रशासन अधिकारी गट-ब, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती देण्याबाबत.
श्री. अविनाश रेवू जाधव

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन आदेश क्रमांकः आपना-२०२४/प्र.क्र.१०६/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ०००१

**तारीखः १८ जून, २०२५.**

वाचा :-

१) **महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांकः** डब्ल्युएसआर-२७२२/प्र.क्र.१११/२०२२/ अठ्ठावीस, दिनांक १५.०७.२०२४.
२) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्रमांकः** परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/कार्या.८, दि. २२.०६.२०२१

## शासन आदेश :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन दिनांक १५ जुलै, २०२४ रोजीच्या पत्रान्वये श्री. अविनाश रेवू जाधव यांची सहाय्यक प्रशासन अधिकारी,गट-ब, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी शिफारस केली आहे. त्यानुसार श्री. अविनाश रेवू जाधव यांची त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ६ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास या पदाचा पदभार स्वीकारतील त्या दिनांकापासून संदर्भाधिन क्रमांक २ येथील नवीन परिवीक्षा धोरणानुसार दोन वर्षांच्या परीविक्षा कालावधीसाठी वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००+ ग्रेड वेतन ४४००/- (सातव्या वेतन आयोगानुसार एस-१५: ४१८००-१३२३००) अधिक त्यावर नियमानुसार मिळणारे महागाई व इतर भत्ते या वेतनश्रेणीमध्ये परिच्छेद क्रमांक २ मध्ये नमूद अटी व शर्तींचा अधीन राहून सहाय्यक प्रशासन अधिकारी,गट-ब, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर नेमणूक करण्यात येत आहे.

| अ.क्र. | मुलाखत क्रमांक | म.लो.आ. ने शिफारस केलेल्या उमेदवाराचे नाव | मूळ प्रवर्ग | म.लो.आ.ने शिफारस केलेली वर्गवारी | सहाय्यक प्रशासन अधिकारी या पदावरील नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १ | श्री. अविनाश रेवू जाधव | वि.जा. (अ) | वि.जा. (अ) | प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, कोकण विभाग, नवी मुंबई. |

०२. श्री. अविनाश रेवू जाधव यांची सहाय्यक प्रशासन अधिकारी, गट-ब, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून नामनिर्देशनाने निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात खालील अटी व शर्तींचा अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे.

१) सदर उमेदवाराची वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००+ ग्रेड वेतन ४४००/- (सातव्या वेतन आयोगानुसार एस-१५: ४१८००-१३२३००)अशी राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता, स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारास परिविक्षा कालावधीत कोणतीही वेतनवाढ अनुज्ञेय राहणार नाही. परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर त्याबाबतचे आदेश निर्गमित केल्यानंतर उमेदवार परिविक्षाधीन नसता तर, अनुज्ञेय होणा-या वेतनवाढी व अनुषंगिक थकबाकी देण्यात येईल.

४) सदर उमेदवाराने परिविक्षा कालावधीत कामाचा अपेक्षित दर्जा न राखल्यास किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्व सूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक ०७/०८/२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरिता संगणक हाताळणी/ वापराबाबतचे ज्ञान ही एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९/०३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षांच्या आत उपलब्ध करून देणे उमेदवारावर बंधनकारक आहे. जर त्यांनी विहित मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करून दिले नाही, तर उक्त कालावधी संपताच त्यांची सहाय्यक प्रशासन अधिकारी या पदावरील सेवा कोणतीही पूर्व सूचना न देता समाप्त करण्यात येईल.

६) सदर उमेदवाराची नियुक्ती सहाय्यक प्रशासन अधिकारी पदाकरिता सरळसेवा प्रवेश नियुक्तीसाठी विहित केलेल्या नियमांच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

७) सदर उमेदवारास विहित विभागीय परीक्षा उत्तीर्ण व्हावी लागेल. तसेच ते अगोदरच विभागीय परीक्षा उत्तीर्ण झाले नसतील किंवा त्यांना त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर, विहित नियमानुसार विभागीय परीक्षा, मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण व्हावी लागेल.

८) सदर उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदींनुसार निश्चित करण्यात यावे.

९) सदर उमेदवाराने त्याच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ६ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत रुजू व्हावे. सदर मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्वीकारली नाही किंवा नियुक्तीच्या संदर्भात वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर कोणतीही पूर्व सूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे आदेश रद्द करण्यात येतील. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि

विकास यंत्रणा, पुणे यांना कळविण्यात येते की, सदर उमेदवार विहित मुदतीत कर्तव्यावर रुजू न झाल्यास उचित कार्यवाहीसाठी शासनास अहवाल सादर करावा.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अनियो-१००५/१२६/सेवा-४, दि. ३१.१०.२००५ मधील तरतूदीनुसार दि. ०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर ज्या अधिकारी/ कर्मचारी यांची शासकीय सेवेत नियुक्ती होते त्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू होईल. सद्या अस्तित्वात असलेली निवृत्ती वेतन योजना (म्हणजेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण), नियम १९८४) आणि सद्या अस्तित्वात असलेली सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू होणार नाही.

११) सदर उमेदवाराचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित शासकीय नियमानुसार राहील.

१२) या उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देय असणार नाही.

१३) सदर उमेदवारास राजीनामा द्यावयाचा असेल किंवा शासकीय नोकरी अन्य कोणत्याही मार्गाने सोडायची असेल तर, त्याने शासनाला कमीत कमी एक महिन्याची पूर्वसूचना दिली पाहिजे.

१४) राज्य प्रशिक्षण धोरणानुसार अनिवार्य प्रशिक्षणे परिविक्षाधीन कालावधीत पूर्ण करणे बंधनकारक राहील. अनिवार्य प्रशिक्षणे आयोजित करण्याची जबाबदारी आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा याची राहील.

१५) सहाय्यक प्रशासन अधिकारी,गट-ब या संवर्गात शिफारस करण्यात आलेला उमेदवार जर शासन सेवेत असेल तर सदर उमेदवारांचे गोपनीय अभिलेख, नियुक्तीपूर्वी तपासण्याबाबत आयोगाने दिलेल्या सूचनेच्या अनुषंगाने शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारानी त्याचे गोपनीय अहवाल १ महिन्याच्या आत आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांचेकडे जमा करावेत. सदर गोपनीय अहवालाच्या तपासणीच्या अधीन राहून सदर उमेदवाराला नियुक्ती देण्यात येत आहे.

०३. श्री. अविनाश रेवू जाधव यांना स्थायी वैद्यकीय मंडळ, श्री.छत्रपती शिवाजी महाराज सर्वोपचार रूग्णालय, सोलापूर मधील वैद्यकीय मंडळाने शासकीय सेवेकरिता वैद्यकीय दृष्ट्या पात्र ठरविले आहे. त्यामुळे आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना कळविण्यात येते की, श्री. अविनाश रेवू जाधव यांच्या वैद्यकीय प्रमाणपत्राची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

०४. श्री. अविनाश रेवू जाधव यांची पोलीस अधीक्षक, धाराशिव आयुक्त, पोलीस आयुक्तालय, ठाणे व वरिष्ठ पोलीस अधीक्षक, बारामुल्ला व कुपवाडा, जम्मु आणि काश्मिर यांच्या कडून पूर्व चारित्र्य पडताळणी करण्यात आली असून, त्यांच्या विरुध्द गुन्हेविषयक आक्षेपार्ह नोंदी आढळून आलेल्या नाहीत. त्यामुळे आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना कळविण्यात येते की, श्री. जाधव यांच्या पूर्व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्राची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

०५. श्री. अविनाश रेवू जाधव यांची सदस्य, उपआयुक्त समाज कल्याण,जात पडताळणी तपासणी समिती, धाराशिव यांच्या कडून जात पडताळणी करण्यात आली असुन जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे. त्यामुळे

आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना कळविण्यात येते की, श्री. जाधव यांच्या जात वैधता प्रमाणपत्राची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

०६. सदर नियुक्ती श्री. अविनाश रेवू जाधव यांनी शासनास सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. सादर केलेल्या प्रमाणपत्रांपैकी कोणतेही प्रमाणपत्र खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०७. हे आदेश प्राप्त होताच श्री. अविनाश रेवू जाधव यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्याकडे सादर करावा. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. अविनाश रेवू जाधव यांचा रुजू अहवाल आपल्या अभिप्रायासह शासनास सादर करावा.

०८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१८११०१५८२९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MAHADEV GENGAJE

Digitally signed by RAJENDRA MAHADEV GENGAJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=9e6d5121ea1547c5b6abac50546c582bc9cb02d8c4ee0e57eb3442ad725208b5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D90328C2FC4E73B881BCFEA3BC5824FA462A2EC1E4EAD4BFE3B4979112BDB493, cn=RAJENDRA MAHADEV GENGAJE
Date: 2025.06.18 11:36:05 +05'30'

**(रा.म.गेंगजे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

श्री. अविनाश रेवु जाधव, मु. पो. डिग्गी, ता. उमरगा, जि. उस्मानाबाद.

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
८. महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरीक्षण/ लेखा व अनुज्ञेयता)
९. महालेखाकार, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरीक्षण/ लेखा व अनुज्ञेयता)

१०. उपसचिव (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अतिरिक्त संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
१२. सहसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे.
१३. उपसंचालक (सर्व), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, कोकण.
१५. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. वरिष्ठ भूवैज्ञानिक (सर्व), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.
१७. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
१८. निवडनस्ती (कार्यासन, पापु-१५)